**जिल्हा रूग्णालय, उस्मानाबाद आवारातील जुनी बर्न वॉर्डची इमारत पाडण्यास परवानगी.**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१५/ प्र.क्र.२/ आरोग्य-४

मंत्रालय, १० वा मजला, कॉम्पलेक्स बिल्डींग,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
तारीख: ३ फेब्रुवारी, २०१५.

**वाचा**

**१) सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये ( राज्यस्तर ),मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/कक्ष-३/टे.६/ बर्नवॉर्डउबादइमापाडणे-२९ /३-२९६-९७/१५, दि.७.०१.२०१५.**

**प्रस्तावना**

सहसंचालक, आरोग्य सेवा, यांनी जिल्हा रूग्णालय, उस्मानाबाद आवारातील जीर्ण झालेली बर्न वॉर्डची इमारत पाडण्यास परवानगी देण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भाधीन पत्रान्वये शासनास सादर केला आहे. जिल्हा रूग्णालय, उस्मानाबाद आवारातील सदर इमारत मोडकळीस आली आहे. सदर इमारत पाडण्यास हरकत नसल्याबात अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, उस्मानाबाद यांनी अहवाल दिला आहे. जिल्हा रूग्णालय, उस्मानाबाद येथे नविन बर्न केअर सेंटरच्या इमारत बांधकामासाठी राष्ट्रीय आरोग्य अभियांनांतर्गत मंजुरी प्राप्त आहे. सदर जीर्ण इमारत पाडल्यास जिल्हा रूग्णालय, उस्मानाबाद येथे नविन बर्न केअर सेंटर इमारत बांधकाम करण्यासाठी जागा उपलब्ध होणार असल्याने ही जीर्ण इमारत पाडण्यास परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

जिल्हा रूग्णालय, उस्मानाबाद येथे नविन बर्न केअर सेंटरच्या इमारत बांधकाम करण्यासाठी राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत निधी मंजुर आहे. तसेच जिल्हा रूग्णालय, उस्मानाबाद आवारातील खालीलप्रमाणे नमूद इमारत मोडकळीस आलेली आहे.

| अ.क्र. | इमारतीचे नांव | पीआरबी क्रमांक | बांधकाम वर्ष | क्षेत्रफळ ( चौ.मी.) |
|---|---|---|---|---|
| १. | जुनी बर्न वॉर्ड इमारत ( लोडबेअरींग टाईप ) | एम.डी.२-४-१९८० | १९८० | २३५.०० |

उपरोक्त जीर्ण इमारत पाडल्यास जिल्हा रूग्णालय, उस्मानाबाद येथे राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत मंजुर नविन बर्न केअर सेंटरची इमारत बांधकाम करण्यासाठी जागा उपलब्ध होणार आहे. या अनुषंगाने ही इमारत/ बांधकाम धोकादायक स्थितीत असल्याचे किंवा दुरूस्तीपलीकडील

असल्याचे लेखी प्रमाणपत्र संबंधित अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी दिल्याखेरीज पाडण्यात येऊ नये या अटीच्या अधीन राहून सदर जीर्ण इमारत पाडण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-१०.०८/ प्र.क्र.७०/ २००८/ विनियम, दि.१५ मे, २००९ सोबतच्या परिशिष्टातील भाग पहिला, उपविभाग-१ मधील अनुक्रमांक ९ येथील नियम क्रमांक ११४ नुसार सरकारी इमारत अथवा संरचना पाडून टाकण्यासंदर्भात प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१२९१४२५३०६९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay D Kamalakar

Digitally signed by Sanjay D Kamalakar
DN: CN = Sanjay D Kamalakar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.02.03 15:49:19 +05'30'

**संजय कमलाकर**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
२. सहसंचालक, आरोग्य सेवा,रूग्णालये ( राज्यस्तर), मुंबई.
३. उपसंचालक, आरोग्य सेवा, लातूर मंडळ, लातूर.
४. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रूग्णालय, उस्मानाबाद.
५. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, उस्मानाबाद.
६. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, उस्मानाबाद.
७. महालेखापाल, महाराष्ट्र -१/ २( लेखा परिक्षा)( लेखा व अनुज्ञेयता ),मुंबई/ नागपूर.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, उस्मानाबाद.
९. सार्वजनिक बांधकाम विभाग ( इमा-३ ), मंत्रालय, मुंबई.
१०. वित्त विभाग ( विनियम कार्यासन ),मंत्रालय, मुंबई.
११. अवर सचिव ( अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती ( आरोग्य-४ ).